**संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियान (२००८-०९)**
**स्पर्धेच्या राज्यस्तरीय फेरीकरीता राज्यस्तरीय**
**तपासणी उप समित्या गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक : नास्वअ २००९/प्र.क्र.११६/पापु २१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ जुलै, २०१०

**पहावे :** शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
क्र.नास्वअ २००८/प्र.क्र.६४/पापु २१, दिनांक २६.१०.२००७

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये सन २००२-०३ पासून संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियान राबविण्यात येत आहे. संदर्भीय शासन निर्णयान्वये सन २००७-०८ या वर्षी राबवावयाच्या अभियानापासून अभियानाच्या प्रतिवर्षाच्या अंमलबजावणीसाठी सुधारित मार्गदर्शक तत्वे निर्गमित करण्यात आली आहेत. या अनुषंगाने, संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानाअंतर्गत स्पर्धेच्या ३ फे-या निश्चित करण्यात आलेल्या असून प्रत्येक फेरीकरीता स्वतंत्र कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली आहे.

संदर्भीय शासन निर्णयातील परिच्छेद २ (VII) १) क) अनुसार स्पर्धेच्या तिस-या (राज्यस्तरीय) फेरीमध्ये गट क्रमांक १ व २ मधील महानगरपालिका आणि गट क्रमांक ३ व ४ मधील नगरपरिषदा यांच्यामधून राज्यस्तरावरील अ+, अ, ब व क दर्जाच्या महानगरपालिका व नगरपरिषदा निवडण्याकरीता शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या पॅनलवरील प्रतिवर्षी निश्चित करण्यात येणा-या नागरी व्यवस्थापन क्षेत्रातील तज्ञ अशासकीय संस्थांमार्फत (NGO) प्रत्यक्ष तसेच आधारभुत माहिती व अभियान कालावधीतील कामगिरी यांच्या आधारे महानगरपालिका / नगर परिषदा यांची तपासणी करण्यात येईल व त्याबाबतचा अहवाल संदर्भीय शासन निर्णयातील परिच्छेद २ (VII) १) क) अन्वये गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीस सादर करण्यात येईल अशी तरतूद करण्यात आलेली आहे. तसेच, कोणकोणत्या NGO कडे कोणकोणत्या महानगरपालिका / नगर परिषदा तपासणीसाठी द्यावयाच्या याबाबतचा तपशील शासनाने निश्चित करावयाचा आहे.

तथापि, सुधारित मार्गदर्शक तत्वांनुसार सन २००७-०८ च्या अभियानापासून राज्यातील नागरी संस्थांची स्पर्धेकरिता विहीत करण्यात आलेल्या प्रत्येक निकषांतर्गत दिनांक २.१०.२००८ पर्यंतची सद्यःस्थिती आणि अभियान कालावधीत केलेल्या कामगिरीच्या अनुषंगाने दिनांक १० जून, २००८ रोजी केलेले स्वयंमुल्यांकन यांच्या आधारे प्रतवारी ठरविण्यात येणार आहे. तथापि संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानाअंतर्गत २००८-०९ च्या

स्पर्धेकरीता विहित केलेल्या १० निकषांअंतर्गत नागरी संस्थांची तपासणी करण्यासाठी राज्यामध्ये नागरी स्वच्छता क्षेत्रात कार्यरत अशी सक्षम अशासकीय संस्था आढळत नसल्यामुळे सन २००८-०९ च्या अभियानांतर्गत स्पर्धेच्या राज्यस्तरीय फेरीकरीता राज्यस्तरीय उप समित्या गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानांतर्गत सन २००८-०९ च्या अभियानाच्या स्पर्धेच्या अंतीम (तिस-या) राज्यस्तरीय फेरीमध्ये गट क्रमांक १ व २ मधील महानगरपालिका आणि गट क्रमांक ३ व ४ मधील नगर परिषदा यांच्यामधून राज्यस्तरावरील अ+, अ, ब व क दर्जाच्या महानगरपालिका व नगरपरिषदा यांची तपासणी करण्याकरीता पुढीलप्रमाणे २ स्वतंत्र राज्यस्तरीय उप समित्या गठीत करण्यात येत आहेत :-

**अ. गट क्रमांक १ व २ मधील प्रत्येक उपगटातील राज्यस्तरावरील अ+,अ, ब व क दर्जाच्या स्वच्छ महानगपालिका यांची तपासणी करण्यासाठी (उपसमिती-१)**

| | | |
|---|---|---|
| १. उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (नागरी स्वच्छता) | - | अध्यक्ष |
| २. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | - | सदस्य |
| ३. अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| किंवा | | |
| यशदा, पुणे येथील नागरी स्वच्छता क्षेत्रातील कार्यरत तज्ञ | - | सदस्य |
| ४. विधीमंडळ संघटनेचे पत्रकार (एक) | - | सदस्य |
| ५. अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | - | सदस्य |
| ६. नगर परिषद प्रशासन संचालनालयाचे कक्ष अधिकारी | - | सदस्य सचिव |

**ब. गट क्रमांक ३ व ४ मधील प्रत्येक उपगटातील राज्यस्तरावरील अ+, अ, ब व क दर्जाच्या स्वच्छ नगर परिषदा तपासण्यासाठी (उपसमिती-२)**

| | | |
|---|---|---|
| १. उप संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई | - | अध्यक्ष |
| २. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | - | सदस्य |
| ३. अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था योच प्रतिनिधी | - | सदस्य |
| किंवा | | |
| यशदा, पुणे येथील नागरी स्वच्छता क्षेत्रातील कार्यरत तज्ञ | - | सदस्य |
| ४. विधीमंडळ संघटनेचे पत्रकार (एक) | - | सदस्य |
| ५. कक्ष अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | - | सदस्य |
| ६. कक्ष अधिकारी, पा.पु.व स्व.विभाग (नागरी स्वच्छता) | - | सदस्य सचिव |

२. वरील दोन्ही समित्यांमार्फत तपासणी कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर स्पर्धेसाठी विहीत केलेल्या १० निकषांतर्गत तपासणी केलेल्या प्रत्येक महानगरपालिकेचा आणि नगर परिषदेचा गुणांकन अहवाल शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक नास्वअ २००७/प्र.क्र.६४/पापु २१ दिनांक २६.१०.२००७ परिच्छेद २ (VIII) क अनुसार गठीत केलेल्या राज्यस्परीय तपासणी समितीस सादर करण्यात येईल. शासन निर्णयातील तरतूदीनुसार राज्यस्तरीय समितीमार्फत हया अहवालाच्या आधारे प्रत्येक गटातील नागरी संस्थांची प्रतवारी (Grading) करुन निकाल अंतीम झाल्यानंतर तो शासनाकडून घोषित करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००७१६१३५९३८००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Sd/-
**( ल.गो.ढोके )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
२) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव
४) मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा.प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा.प्रधान सचिव, / सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा.सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मा.सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
९) मा.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) मा.प्रधान सचिव / सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
११) मा.सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१३) सर्व विभागीय आयुक्त
१४) सर्व महानगरपालिकांचे महापौर / आयुक्त.
१५) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
१६) उप संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
१७) अध्यक्ष, विधीमंडळ पत्रकार संघटना, मंत्रालय, मुंबई
१८) सर्व जिल्हाधिकारी
१९) सर्व नगरपरिषदा / पंचायती यांचे अध्यक्ष / मुख्याधिकारी
२०) श्रीमती स्नेहा पळणीटकर, संचालिका, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, मुंबई
२१) श्री.आशिष देवस्थळी, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, मुंबई
२२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व अधिकारी
२३) संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२४) निवडनस्ती, पापु-२१